**वाकोद ता. जामनेर, जि. जळगांव येथे वाघूर नदीच्या डाव्या बाजूस कटोनी भिल्ल वस्तीजवळील पुर संरक्षक भिंत बांधणेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०१६/ (प्र.क्र. ५२०/२०१६)/ सिं.व्य.(महसूल)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक: १ एप्रिल, २०१७.

**वाचा : १) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र. कासं/ तापाविम/ प्रशा-७/५६८७/सन-२०१६, दि. १०.११.२०१६.**
**२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.कासं/ तापाविम/ प्रशा-७/ ६५६८/सन-२०१६, दि. ३०.१२.२०१६.**

**प्रस्तावना :-**

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत वाकोद ता.जामनेर जि. जळगाव हे गांव वाघुर नदीच्या तीरावर वसलेले आहे. वाघुर नदीला येणाऱ्या पूरामुळे नदीकाठ मोठया प्रमाणावर पोखरला जात आहे. यामुळे नदी काठावरील काही लोकवस्तीला पूराचा धोका निर्माण होऊ शकतो. हे काम वाघुर नदीच्या पूराच्या विसर्गामुळे काही लोकांच्या जिवितास व मालमत्तेस धोका होऊ नये याकरीता करणे आवश्यक आहे. सदर कामाची मागणी ग्रामपंचायत, वाकोद, ता.जामनेर यांना ठराव क्र. ४/२, दि. १.०५.२०१६ नुसार केलेली होती. उपरोक्त बाबी विचारात घेता **वाकोद ता. जामनेर, जि. जळगांव येथे वाघूर नदीच्या डाव्या बाजूस कटोनी भिल्ल वस्तीजवळ पूरसंरक्षक भिंत** बांधण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत **वाकोद ता. जामनेर, जि. जळगांव येथे वाघूर नदीच्या डाव्या बाजूस कटोनी भिल्ल वस्तीजवळील पुर संरक्षक भिंत** बांधण्याच्या कामासाठी **रू. ९३,७५,११८/-** व अनुषंगिक खर्च **रू. २,८१,२५४/-** अशा एकूण **रू. ९६,५६,३७२/- (रू. शहानव लक्ष छपन्न हजार तीनशे बाहत्तर फक्त)** एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन परिपत्रक क्र.एफडीडब्ल्यु-१०९२/(१७०)/सिं.व्य.(कामे), दि.७.८.१९९२ नुसार कार्यवाही करावी.

ब) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

क) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे.

ड) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधीतांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी.

इ) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल याची दक्षता नियोजनात घ्यावी.

ई) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत वाकोद ता. जामनेर ग्रामपंचायतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दूरूस्ती करावयाची आहे. काम सुरू करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र वाकोद ग्रामपंचायतकडून प्राप्त करून घ्यावे.

प) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव भागभांडवली अंशदान (४७११ ०२३६) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ३/सन २०१७-१८ वर नोंदविण्यात आलेली आहे.

प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१७०४०११७१७३३३४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.04.01 17:19:17 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
शासनाच्या अवर सचिव

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,

७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

८) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

११) महालेखापाल-२ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,

१३) मुख्यअभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,

१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव,

१६) कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगांव,

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.